**अनुसूचित जाती व नवबौध्द घटकाचे**
**सबळीकरण व स्वाभिमान योजना**

**महाराष्ट्र शासन**
सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक : विघयो-२००४/प्र.क्र.१२५/विघयो-२
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २ जून, २००४.

**शासन निर्णय :-** अनुसूचित जाती व नवबौध्दांकरिता शैक्षणिक सुविधा राज्य शासनाने उपलब्ध केल्यामुळे त्यांच्यामध्ये शिक्षणाचे प्रमाण वाढत आहे. सध्याच्या उदारीकरणाच्या धोरणामुळे नोकऱ्या उपलब्ध होण्याचे प्रमाण कमी झालेले आहे. त्यामुळे सर्वसाधारण लोकांमध्ये आढळून येणारे सुशिक्षित बेरोजगारांचे प्रमाण अनुसूचित जाती व नवबौध्दांच्या लोकांमध्ये जास्त आढळते. ज्या अनुसूचित जाती व नवबौध्द कुटुंबांकडे कसण्याकरिता जमीन आहे त्यांना उत्पन्नाचे साधन उपलब्ध झालेले आहे. मात्र दारिद्रय रेषेखालील भूमिहिन शेतमजूर कुटुंबांना उदरनिर्वाहाचे अन्य साधन नसल्याने त्यांना रोजगार हमी योजना किंवा खाजगी व्यक्तींकडे मजुरी करावी लागते. परिणामी, त्यांच्या राहणीमानावर प्रतिकुल परिणाम होतो. त्यांचे उत्पन्नाचे स्त्रोत वाढावे व त्यांच्या राहणीमानात बदल व्हावा याकरिता त्यांचे मजूरीवर असलेले अवलंबित्व कमी होऊन त्यांना कायमस्वरुपी उत्पन्नाचे साधन उपलब्ध होणे आवश्यक आहे. याकरिता या विभागामार्फत दारिद्रय रेषेखालील अनुसूचित जाती व नवबौध्द भूमिहिन शेतमजूर कुटुंबांना उत्पन्नाचे स्त्रोत उपलब्ध व्हावे म्हणून त्यांना कसण्याकरिता जमिन उपलब्ध करावयाची आहे. त्यासाठी ५०% अनुदान व ५० % कर्ज या स्वरुपात निधी उपलब्ध करुन देण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे व या योजनेला प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. भूमिहिन शेतमजूर अनुसूचित जाती व नवबौध्दांना जी जमिन वाटप करावयाची आहे त्या जमिनीचे दर निश्चित करणे, खरेदी करणे तसेच लाभार्थ्यांची निवड करण्यासाठी संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे जिल्हास्तरीय समिती स्थापन करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २ | संचालक, समाजकल्याण, पुणे | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ३ | मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद | सदस्य |
| ४ | जिल्हा भूमि अभिलेख अधिकारी | सदस्य |
| ५ | सह निबंधक, नोंदणी शुल्क व मुल्यांकन | सदस्य |
| ६ | विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी | सदस्य सचिव |

३. भूमिहीन शेतमजूर अनुसूचित जाती व नवबौध्दांना उत्तम प्रतीची जमिन माफक दराने उपलब्ध व्हावी म्हणून जिल्हा प्रशासनाचे मुख्य असलेले जिल्हाधिकारी यांची समितीचे "अध्यक्ष" म्हणून नेमणूक केलेली आहे.

४. जिल्ह्यात ज्या ठिकाणी चांगल्या प्रतीची जमिन उपलब्ध आहे व त्या ठिकाणी जी दारिद्रय रेषेखालील अनुसूचित जाती व नवबौध्द भूमिहीन शेतमजूर कुंटुंबे मोठ्या प्रमाणात आहेत. त्यांचा शोध घ्यावा. प्रथम जमिन उपलब्धता निर्धारण करुन प्रचलित शासकीय आदेशानुसार दर निश्चित करुन खरेदीची प्रक्रिया पुर्ण करावी. जमिनीच्या उपलब्धतेनुसार लाभार्थ्यांची निवड करावी. जमिन उपलब्ध झालेल्या गावांच्या परिसरात राहणा-या सर्व दारिद्रय रेषेखालील भूमिहीन शेतमजूर लाभार्थ्यांच्या नावाच्या चिठ्ठया टाकून जिल्हाधिका-यांच्या नियंत्रणाखालील समितीने लाभार्थ्यांची निवड करावी. प्राथम्यक्रम द्यावयाच्या वर्गासाठी वेगळ्या चिठ्ठया टाकून निवडीची प्रक्रिया पुर्ण करावी. निवड प्रक्रिया अत्यंत पारदर्शक असणे आवश्यक आहे. या प्रक्रियेकरिता लागणारी माहिती संचालक, समाजकल्याण, पुणे यांनी संकलित करुन निवड समितीस उपलब्ध करुन द्यावी.

५. जिल्हाधिका-यांच्या नियंत्रणाखाली समितीने खरेदी केलेल्या जमिनीचे ठिकाण, जमिनीचे दर, जमिनीचे नकाशे, लाभार्थ्यांची यादी व ज्यांना जमिनीचे वाटप करावयाचे आहे त्यांच्याकडून घेतलेल्या करार नाम्याच्या प्रती व सर्व माहितीसह संचालक, समाजकल्याण यांच्याकडे प्रस्ताव पाठवावा. संचालक, समाजकल्याण यांनी प्रस्तावास अंतिम मान्यता देऊन रक्कम वितरित करुन लाभधारकांना जमिनीचा ताबा देण्याची व्यवस्था करावी.

६. सदरहू योजना पुढील अटी व शर्तीनुसार राबविली जाईल :-

१) सदरहू योजना लागू करण्याकरिता दि. १.४.२००४ हा दिनांक निश्चित करण्यात येत आहे.

H-207 (1000-6-04) 135

या योजनेतंर्गत शासनाकडून जमीन खरेदी करुन ती भूमिहिन अनुसूचित जातींच्या कुटुंबाच्या पती-पत्नीच्या नावे केली जाईल. मात्र विधवा व परित्यक्त्या स्त्रियांच्या बाबतीत जमीन त्यांच्या नावे केली जाईल.

अनुसूचित जाती व नवबौध्द घटकाच्या दारिद्रय रेषेखालील भूमीहीन शेतमजूर कुटूंबाला ४ एकर कोरडवाहू जमीन किंवा २ एकर ओलीताखालील जमीन उपलब्ध करुन देण्यात यावी.

जमीन खरेदीसाठी येणाऱ्या खर्चापैकी ५० टक्के रक्कम बिनव्याजी कर्ज व ५० टक्के रक्कम अनुदान असेल. कर्जाचा भाग वित्तिय संस्था अथवा राष्ट्रीय अनुसूचित जाती वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली किंवा राष्ट्रीयकृत आणि सहकार बँक या संस्थेकडून उपलब्ध करुन घेण्यात येईल. NSFDC कर्जावर राज्य शासनाची हमी राहील. NSFDC आणि बँक यांना देय व्याज शासनाकडून देण्यात येईल.

या योजनेंतर्गत उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी संचालक, समाजकल्याण, पुणे यांच्या अधिनस्त राहील.

या योजनेचे संनियंत्रण समाजकल्याण, पुणे हे करतील आणि त्याचा अहवाल दर तीन महिन्यांनी शासनास सादर करतील.

या योजनेतंर्गत लाभार्थ्यांचे किमान वय १८ व कमाल वय ६० इतके असावे.
या योजनेतंर्गत निवडण्यात येणारा लाभार्थी हा दारिद्रय रेषेखालील भूमीहिन शेत मजूर असावा.

या योजनेकरिता निवडावयाच्या लाभार्थ्यांमध्ये खालील घटकांना प्राधान्य देण्यात यावे :-

अ) भूमिहीन शेतमजूर परित्यक्ता स्त्रियां, ब ) भूमिहीन शेतमजूर विधवा स्त्रियां

महसूल व वन विभागाने ज्याना गायरान व सिलिंगच्या जमीनीचे वाटप केले आहे त्या कुटुंबांना ह्या योजनेचा लाभ मिळणार नाही.

खरेदी करण्यात येणारी जमीन ही पती-पत्नीच्या नावाने खरेदी करण्यात यावी. मात्र, भूमिहीन शेतमजूर विधवा व परित्यक्त्या स्त्रियांच्याबाबतीत त्यांच्या नांवानेच जमीन खरेदी करण्यात यावी.

जमीन उपलब्ध करुन दिलेल्या अनुसूचित जाती व नवबौध्द भूमीहीन शेतमजूर कुटूंबास कोणत्याही कारणास्तव जमीन अन्य कोणत्याही व्यक्तीला हस्तांतरीत करता येणार नाही.

अनुसूचित जाती व नवबौध्द भूमीहीन शेतमजूर कुटूंबाला देण्यात येणारे कर्ज हे बिनव्याजी व १० वर्षे मुदतीकरिता असेल. कर्जफेडीची सुरुवात कर्ज मंजूरीनंतर २ वर्षानंतर सुरु होईल.

योजनेचा लाभ देण्याच्या या कार्यक्रमावरील नियंत्रणाची व अंमलबजावणीची संपूर्ण जबाबदारी संचालक, समाजकल्याण, पुणे यांची राहील. या योजनेकरिता प्रतिवर्षी आवश्यक एवढी रक्कम संचालक, समाजकल्याण, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यात येईल. त्यामध्येच अनुदान व कर्जाच्या रकमेचा समावेश आहे. कर्ज व अनुदान याचा हिशोब संचालक, समाजकल्याण, पुणे यांनी ठेवावा.

८. भूमिहिन अनुसूचित जाती व नवबौध्दांना वाटप केलेली जमीन त्यांना कोणत्याही परिस्थितीत विकता येणार नाही. त्यांनी विहित मुदतीत कर्जाची परतफेड करणे आवश्यक आहे. संबंधित लाभधारकाने जमीन स्वत: कसणे आवश्यक आहे. त्याबाबतचा करारनामा त्यांच्याकडून घेण्यात यावा.

९. ही योजना शासनाने अनुसूचित जाती व नवबौध्द शेतमजूर दुर्बल घटकांसाठी तयार केलेली महत्वाकांक्षी योजना असून, विभागीय समाजकल्याण अधिकारी यांनी दर महिन्याला त्याचा आढावा घ्यावा व योजनेचे संनियंत्रण करावे.

१०. सदर योजना समाजकल्याण उपयोजना मुंबई आणि मुंबई उपनगर सोडून सर्व जिल्हयात राबविण्यात येईल. दरवर्षी या योजनेकरिता आवश्यक निधी उपलब्ध करण्यात येईल.

११. राष्ट्रीय अनुसूचित जाती वित्त व विकास महामंडळ किंवा राष्ट्रीयकृत बॅंक / अथवा सहकार बॅंक यांचेमार्फत जमिनीसाठी जे कर्ज उपलब्ध होणार आहे त्याकरिता त्यांच्याशी पत्रव्यवहारासाठी संचालक, समाजकल्याण, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

१२. सदर योजना राबविण्याकरिता होणारा खर्च खालील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा.

"मागणी क्र.एन-४ - २२२५ - अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण, ०१ - अनुसूचित जातीचे कल्याण,
१०२ - आर्थिक विकास, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनातर्गत योजना
(०३) (०५) अनुसूचित जाती व नवबौध्द भूमिहीन शेत मजूरांना जमिनीचे वाटप
(२२२५-३६१-८) योजनांतर्गत / दत्तमत."

"मागणी क्र.एन-५ - " ६२२५ - अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांच्या कल्याणासाठी कर्ज, ४८- कर्जे, ०१,अनुसूचित जातीचे कल्याण,
८०० - इतर कर्जे, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (वि. घ. यो.)
(०१ ) ( ०४ ) अनुसूचित जाती व नवबौध्द भूमिहिन शेतमजूरांना जमिनीचे वाटप करण्याबाबत कर्ज ( ६२२५-०२६-१) योजनांतर्गत /दत्तमत."

१३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३२६ /०४ / व्यय-१४, दिनांक ११.०३.२००४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(डॉ. मुन्शिलाल गौतम )
प्रधान सचिव

प्रति,
सर्व जिल्हाधिकारी.
संचालक, समाजकल्याण, पुणे.
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी.
सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी.
प्रधान सचिव, महसूल व वन विभाग,(महसूल), मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.

महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१,मुंबई .
महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट-२,नागपुर.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१,मुंबई.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२,नागपुर.
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद.
जिल्हा भूमि अभिलेख अधिकारी
सह निबंधक, नोंदणी शुल्क व मुल्यांकन
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई.
लेखा व कोषागारे संचालनालय, संगणक शाखा, नविन प्रशासकीय भवन, मुंबई-३२.
मा. मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव
वित्त विभाग (व्यय-१४/अर्थ-१७), मंत्रालय, मुंबई.
मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई-४०० ६१४.
निवड नस्ती (विघयो-२), सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.